**मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि.६ जुलै,२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात मंत्रिमंडळ उपसमितीची स्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीसी २०१८/प्र.क्र.७२/१६-ब**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ५ जून, २०१८.

**प्रस्तावना-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर,एफसीआय आणि इतर विरूद्ध जगदिश बलराम बहिरा व इतर) व इतर याचिकामध्ये दि.६ जुलै,२०१७ रोजी अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती , विजा-अ,भज-ब,भज-क,भज-ड,विशेष मागास प्रवर्ग अथवा इतर मागासवर्ग या जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही. असा निर्णय दिलेला आहे.

२. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यापूर्वी, या निर्णयामुळे प्रशासनावर होणारा दूरगामी परिणाम विचारात घेता, शासनाच्या विविध विभागातील अधिकारी/कर्मचारी, राज्य शासनाचे उपक्रम /कंपनी इ. तसेच शैक्षणिक संस्था व इतर माध्यमांद्वारे दिलेल्या नियुक्त्यांची सर्वकष छाननी करणे गरजेचे आहे. त्यासाठी मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी कशाप्रकारे करावी याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी व शासनास शिफारस करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मा.सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर,एफसीआय आणि इतर विरूद्ध जगदिश बलराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामधील उपरोक्त आदेश विचारात घेता, सदर निर्णयाची अंमलबजावणी कशाप्रकारे व्हावी याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी व शासनास शिफारस करण्यासाठी मा.मंत्री,आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती स्थापना करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री ,आदिवासी विकास | अध्यक्ष |
| २. | मा.मंत्री,उच्च व तंत्र शिक्षण | सदस्य |
| ३. | मा.मंत्री,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये | सदस्य |
| ४. | मा.मंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य | सदस्य |
| ५. | मा.मंत्री,विजा-भज,विमाप्र व इमाव कल्याण | सदस्य |

**सचिव (साविस) सामान्य प्रशासन विभाग, हे सदर समितीचे सदस्य सचिव व प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग हे आमंत्रित सदस्य असतील.**

३. उपरोक्त मंत्रिमंडळ उपसमितीने मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.६ जुलै,२०१७ च्या निर्णयाचा परिपूर्ण अभ्यास करून, या निर्णयामुळे प्रशासनावर होणारा दूरगामी परिणाम विचारात घेता, या निर्णयाची अंमलबजावणी कशाप्रकारे व्हावी याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी शासनास तीन महिन्यात आपला अहवाल सादर करावा.

४. सदर उपसमितीच्या शिफारंशीवर अंतिम निर्णय होईपर्यंत कोणत्याही अधिकारी/ कर्मचाऱ्यांना जात प्रमाणपत्र अवैध ठरले म्हणून सेवेतून कमी करण्यात येऊ नये.

५. संबंधीत प्रशासकीय विभागाने/नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी जात प्रामाणपत्र अवैध ठरलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या संख्ये इतकी अधिसंख्य पदे निर्माण करावीत.

६. वरील अधिकारी /कर्मचारी सेवामुक्त होत नाहीत तोवर खुल्या प्रवर्गात समजण्यात यावेत व ज्या राखीव जागांवर त्यांना नियुक्ती मिळाली आहे, त्या रिक्त समजण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय राज्यातील सर्व शासकीय, निमशासकीय कार्यालये, सेवामंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, शैक्षणिक संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था, जिल्हा परिषदा, महामंडळे, शासकीय अनुदान प्राप्त संस्था, विद्यापीठे,सहकारी संस्था , शासकीय उपक्रम व शासनाच्या अधिपत्याखालील किंवा शासनाने अनुदान दिलेली मंडळे इत्यादींना लागू राहील. याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांना/आस्थापनांना योग्य ते आदेश निर्गमित करावेत व सदर आदेशाची संबंधित प्रशासकिय विभागाने तातडीने अंमलबजावणी करावी.

८. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०६०५१३३५०५१४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudam Eknath Andhale

Digitally signed by Sudam Eknath Andhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257966df2620df1403d35023802519a4fbdcfcd894791eba41c2aef2b4c4b975, serialNumber=7b57fee59f0e7101b822a49c72629c21bf9b4dc0bde136817ee19b6b347e77f4, cn=Sudam Eknath Andhale
Date: 2018.06.05 13:35:09 +05'30'

**( सु.ए.आंधळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.राज्यपाल यांचे सचिव,
२.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४.मा. विरोधी पक्षनेता,विधानपरिषद
५.मा. विरोधी पक्षनेता,विधानसभा
६.सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
८.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
९.प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा)
१०.प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद)
११.सर्व विभागीय आयुक्त,
१२.सर्व सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष)
१३.सर्व जिल्हाधिकारी,
१४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
१६.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१७.प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१८.प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,नागपूर,औरंगाबाद,
१९.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२०.सचिव,राज्य निवडणूक आयोग,
२१.सचिव,राज्य माहिती आयोग,
२२.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२३.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
२४.सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२५.सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
२६.संचालक, समाजकल्याण, पुणे,
२७.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
२८.संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
२९.संचालक, सेवायोजन, मुंबई,